**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, केळीकोतुळ, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील इमारत दुरुस्ती व मुलांच्या वसतिगृहाच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.१४१/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

**शासन निर्णय :** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय केळीकोतुळे, ता.अकोले, जि.अहमदनगर येथील इमारत दुरुस्तीच्या रु.६,६०,५८१/- व मुलांच्या वसतिगृह दुरुस्तीच्या रु.५,००,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केली असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, राजूर यांनी तपासली आहेत. तसेच उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, राजूर, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर यानी साक्षांकित केली आहेत.

३. सदर अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या दरसूचीवर आधारित आहेत. सदर कामे दुरुस्तीची असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या व वसतिगृहाच्या इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकांस खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | **अंदाजपत्रकीय किंमत** |
|---|---|---|
| १ | आश्रमशाळा केळीकोतुळ येथील इमारत दुरुस्ती | रु.६,६०,५८१/- |
| २ | मुलांचे वसतिगृह इमारत दुरुस्ती | रु.५,००,०००/- |
| | **एकूण** | **रु.११,६०,५८१/-** |

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओग्राफी करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००३०३१६१८२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, राजूर.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.